सन २०२२-२३ मधील अर्थसंकल्पित तरतूदीचे वितरण करणेबाबत.
शेतकऱ्यांना अल्पमुदती पीककर्ज पुरवठा करण्यासाठी १ टक्का व्याजदराने अर्थसहाय्य (२४२५१५०१)-३३ अर्थसहाय्य

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. पूरक ११२२/प्र.क्र.१७५/१८-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २५ मार्च, २०२३

**वाचा :-**

१. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय, क्रमांक सीसीआर १४०६/प्र.क्र.२४७/२-स, दिनांक १७/०५/२००६
२. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय, क्रमांक अर्थसं०६२-२/प्र.क्र.८३/१८-स, दिनांक २७०/६२०२/२
३. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय, क्रमांक अर्थसं०६२-२/प्र.क्र.८३/१८-स, दिनांक १०२०२/१०/२
४. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय, क्रमांक अर्थसं०६२-२/प्र.क्र.८३/१८-स, दिनांक ०५१/२२०२/२
५. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन पत्र, क्र.पूरक-१९२२/प्र.क्र.११२/१७-स, दिनांक ३०/१२/२०२२

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक १ अन्वये राज्य शासनाने राज्यातील शेतकऱ्यांना ६% व्याज दराने अल्प मुदत पीक कर्ज पुरवठा होण्यासाठी शासकीय अर्थसहाय्याचा निर्णय घेतलेला आहे. या निर्णयानुसार, केंद्र शासनाचे धोरणानुसार बँका ज्या ठिकाणी शेतकऱ्यांना ७% व्याज दराने कर्ज पुरवठा करणार आहेत, त्या ठिकाणी बँकांनी ७% ऐवजी शेतकऱ्यांना ६% व्याज दराने कर्ज पुरवठा करावा, असे राज्य शासनाचे धोरण आहे. या प्रयोजनासाठी १% व्याज फरकाच्या रक्कमेचा आर्थिक भार शासनावर आहे. सन २००६-०७ पासून खरीप व रब्बी हंगामामध्ये राज्यातील जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका, राष्ट्रीयकृत बँका आणि प्रादेशिक ग्रामीण बँका व सन २०१३-१४ पासून शेतकऱ्यांना रुपये ३.०० लाखापर्यंत अल्प मुदत पीक कर्ज वाटप करणाऱ्या खाजगी बँकांना या निर्णयाचा लाभ देण्यात येत आहे.

सन २०२२-२३ या वर्षाकरीता शेतकऱ्यांना अल्प मुदत पीक कर्ज पुरवठा करण्यासाठी १% व्याज दराने अर्थसहाय्य (२४२५१५०१) या योजनेअंतर्गत एकूण रू.३०८७९.०० लाख इतका निधी आवश्यक असल्यामुळे सन २०२२-२३ ची मंजूर अर्थसंकल्पीय तरतूद वगळता रू. २९४००.०० लाखाची पुरवणी मागणी डिसेंबर, २०२२ च्या हिवाळी अधिवेशनात सादर करण्यात आली होती. त्यापैकी रू.१००००.०० लाख इतकी मागणी मंजूर करण्यात आली असून सदर निधी नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेने वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

सन २०२२-२३ वर्षात शेतकऱ्यांना अल्प मुदत पीक कर्ज पुरवठा करण्यासाठी १% व्याज दराने अर्थसहाय्य (२४२५ १५०१)-३३ अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली सन २०२२ च्या हिवाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे रू. १००००.०० लाख एवढी रक्कम मंजूर करण्यात आली आहे. सदर रक्कमेपैकी नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेने ८०% म्हणजेच रू.८००० लाख (रूपये ऐंशी कोटी फक्त) एवढ्या निधीचे वितरण करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर तरतूद संबंधित संस्थांना अदा करण्यासाठी V०००४-सहायक निबंधक (अर्थसंकल्प आणि नियोजन) आयुक्त, सहकार, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच लेखाधिकारी, अधिन सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी आहरण करून हा खर्च किती वेळेत होईल हे सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी पहावे. तसेच याबाबतचा अहवाल व विकास मंडळनिहाय खर्चाची माहिती वेळो वेळी शासनास पाठवावी.

३. सदरहू रक्कम मागणी क्र.व्ही - २ मुख्यलेखाशिर्ष " २४२५ सहकार - (१०७), सहकारी पत संस्थांना सहाय्य (०१) (१०) - शेतकऱ्यांना अल्पमुदती पीक कर्ज पुरवठा करण्यासाठी **१% व्याज दराने अर्थसहाय्य (कार्यक्रम) (दत्तमत)** (२४२५ १५०१) ३३, अर्थसहाय्य ", या लेखाशिर्षाखालील सन २०२२-२३ या वर्षासाठी उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून सदर रक्कम खर्च करण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व त्यांचे अनौपचारिक संदर्भ क्र. ६५ / १४३१, दि. ९.२.२०२३ तसेच वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांचे अनौपचारीक संदर्भ क्र. १७१/ २०२३/व्यय-२, दि. २२.२.२०२३ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३२५१४४७२८३००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Shrikrushna
Anandrao Wadekar

Digitally signed by Shrikrushna Anandrao Wadekar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7305071c9d8b281074f8452b1a671851b99ce164d8bd282bfeb775611d0eb87e, pseudonym=A9B19E68D73171B69896843593789CD99AC6DBD5, serialNumber=2711D1231BE138057C3C88E0EFB4B1CD5177AA9E3C71FCD2EDF6EC025114EB89, cn=Shrikrushna Anandrao Wadekar
Date: 2023.03.25 14:53:45 +05'30'

**( श्रीकृष्ण वाडेकर )**
वि. का. अ. तथा सहनिबंधक, महाराष्ट्र शासन

**प्रत : माहितीसाठी व योग्य त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित,**

१. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. महालेखाकार, महाराष्ट्र- १, मुंबई.
५. महालेखाकार, महाराष्ट्र- २, नागपूर.
६. समन्वयक, राज्यस्तरीय बँकर्स समिती, पुणे.
७. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक, लि. मुंबई.
८. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था.
९. सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था.
१०. वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प-१३, मंत्रालय, मुंबई.
११. अवर सचिव (कार्या. १७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. कोषागार अधिकारी, पुणे.
१३. निवड नस्ती-१८-स.